**सहायक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित) व नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित) या तांत्रिक संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदोन्नतीने / बदलीने पदस्थापना करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. प्रतिनि-१२१७/१३२/प्र.क्र.४८/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०२ जून, २०१७.

वाचा :-१. नगर विकास विभाग, शासन अधिसूचना क्र.अमपा-२०१२/प्र.क्र.३०१ (भाग-२)/नवि-२५, दि.०६.०२.२०१६.
२. आयुक्त, अहमदनगर महानगरपालिका यांचे पत्र क्र.साप्रवि/महानगरपालिका-अ नगर/८९४, दि.०७.०१.२०१७.
३. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.पदोन्न-१३१५/१२२३/प्र.क्र.२०३/२०१५/नवि-२७, दि.३०.१२.२०१६.

**प्रस्तावना :-**

नगर विकास विभागाच्या संदर्भाधिन, दि.०६.०२.२०१६ अन्वये अहमदनगर महानगरपालिका सेवा (सेवा प्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०१६ अमंलात आले आहेत. त्यानुसार अहमदनगर महानगरपालिकेच्या शहर विकास सेवा विभागामध्ये उप संचालक, नगर रचना, सहायक संचालक, नगर रचना व सहाय्यक नगर रचनाकार ही पदे नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील संबंधित संवर्गातील अधिकाऱ्यांमधून १००% प्रतिनियुक्तीने भरण्याची तरतूद करण्यात आली आहे.

**०२.** आयुक्त, अहमदनगर महानगरपालिका यांनी संदर्भाधिन, दि.०७.०१.२०१७ रोजीच्या पत्रान्वये अहमदनगर महानगरपालिका येथील उप संचालक, नगर रचना व सहायक संचालक, नगर रचना या दोन्ही पदांवर तातडीने अधिकारी उपलब्ध करुन देण्याची विनंती केलेली आहे.

**०३.** नगर विकास विभागाच्या संदर्भाधिन, दि.३०.१२.२०१६ रोजीच्या आदेशान्वये श्री. संतोष दत्तात्रय धोंगडे, नगर रचनाकार, सहायक संचालक, नगर रचना, अहमदनगर शाखा, अहमदनगर यांना सहायक संचालक, नगर रचना (पीबी ३ रु.१५६००-३९१००+ग्रेड पे रु.६,६००) पदावर पदोन्नतीने जळगांव महानगरपालिका येथे पदस्थापना देण्यात आली आहे. तथापि, कौटुंबिक अडचणीस्तव ते पदोन्नतीच्या ठिकाणी रुजू होऊ शकले नाहीत. श्री. सं. द. धोंगडे, नगर रचनाकार यांनी दि.२७.०२.२०१७ रोजीच्या विनंती अर्जान्वये जळगांव महानगरपालिका येथील पदस्थापनेत अंशत: सुधारणा करुन त्यांना अहमदनगर महानगरपालिका येथे पदस्थापना देण्याची विनंती केली आहे.

**०४.** वरील बाबी विचारात घेता, अहमदनगर महानगरपालिका येथील सहायक संचालक, नगर रचना पदावर प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्याची तसेच श्री. सं. द. धोंगडे, नगर रचनाकार यांच्या पदोन्नतीने रिक्त होणाऱ्या सहायक संचालक, नगर रचना, अहमदनगर शाखा, अहमदनगर येथील नगर रचनाकार पदावर पदस्थापना देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्याबाबत पुढीलप्रमाणे शासन आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) (दोन) व कलम ४ (५) मधील तरतुदींनुसार, स्वविनंती /

प्रशासकीय कारणास्तव सहायक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित) / नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित) या संवर्गातील खालील अधिकाऱ्यांना पुढील विवरणपत्रात दर्शविल्यानुसार प्रतिनियुक्तीने / बदलीने पदस्थापना देण्यात येत आहेत.:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्या कार्यरत असलेले कार्यालय | बदली / पदोन्नतीने पदस्थापनेचे कार्यालय | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. संतोष दत्तात्रय धोंगडे | सहायक संचालक, नगर रचना, अहमदनगर शाखा, अहमदनगर. | सहायक संचालक, नगर रचना, अहमदनगर महानगरपालिका, अहमदनगर (रिक्त पदी) | प्रतिनियुक्तीने ०३ वर्षाकरिता (वेतन संरक्षणासह) |
| २ | श्री. राजेश मधुकर पाटील | नगर रचनाकार, अहमदनगर महानगरपालिका, अहमदनगर. | सहायक संचालक, नगर रचना, अहमदनगर शाखा, अहमदनगर. (श्री. सं. द. धोंगडे, न. र. यांच्या पदोन्नतीने रिक्त होणाऱ्या पदी) | प्रशासकीय कारणास्तव. |

**०२.** श्री. सं. द. धोंगडे, नगर रचनाकार यांना सहायक संचालक, नगर रचना पदावरील पदोन्नतीने सुधारित पदस्थापना देण्यात येत असल्याने ते ज्या दिनांकास सुधारित पदस्थापनेच्या ठिकाणी पदावर रुजू होतील, त्या दिनांकापासून ते पदोन्नत झाल्याचे समजण्यात येईल.

**०३.** श्री. सं. द. धोंगडे, नगर रचनाकार व श्री. रा. म. पाटील,नगर रचनाकार यांच्या स्थानिक पदस्थापना असल्याने त्यांना पदग्रहण अवधी व संयुक्त बदली अनुदान अनुज्ञेय होणार नाही.

**०४.** संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी वरील अधिकाऱ्यांना बदलीने / पदोन्नतीने पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्याकरिता आवश्यक ते कार्यकारी आदेश तातडीने निर्गमित करावेत. तद्नंतर, संबंधित अधिकाऱ्यांनी संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यकारी आदेश प्राप्त होताच पदस्थापनेच्या ठिकाणी तातडीने रुजू व्हावे.

**०५.** सदरहू आदेशान्वये बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा राजकीय दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न केल्यास त्याची संबंधित अधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालात नोंद घेण्यात येईल. तसेच राजकीय दबावाबाबतची कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम ३ (३) व २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून संबंधितांविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची नोंद घेण्यात यावी.

**०६.** संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी, सदर बदल्यांच्या अनुषंगाने रिक्त होणाऱ्या पदाचा अतिरिक्त कार्यभार त्याच अथवा नजिकच्या कार्यालयातील समकक्ष दर्जाच्या अधिकाऱ्यांकडे अथवा बदली होणाऱ्या अधिकाऱ्याच्या संवर्गास कनिष्ठ असलेल्या संवर्गामधील त्याच कार्यालयातील ज्येष्ठ अधिकाऱ्याकडे सोपविण्यात यावा. परंतू, कोणत्याही परिस्थितीत बदली होणाऱ्या अधिकाऱ्याकडे त्याच्या बदलीमुळे रिक्त होणाऱ्या पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविला जाणार नाही, याची दक्षता घ्यावी.

**०७.** सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१७०६०२१०४७०४१४२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Eknath Kisan Sahane

Digitally signed by Eknath Kisan Sahane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c2f7e29994246b598ed0f72234360bb639afd8fae26e0e7238d80dcb921ce52a, cn=Eknath Kisan Sahane
Date: 2017.06.02 16:57:17 +05'30'

**( ए. कि. सहाणे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

संबंधित अधिकारी ---------------------------------------------यांना,
(संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत.)

**प्रत :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
३. महालेखापाल (लेखा परिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा परिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
५. मा. मुख्य मंत्र्याचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त, अहमदनगर महानगरपालिका, अहमदनगर.
७. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-४११ ००१. **(३-प्रती)**
८. सह संचालक, नगर रचना, नाशिक विभाग, नाशिक.
९. सहायक संचालक, नगर रचना, अहमदनगर शाखा, अहमदनगर.
१०. कार्यासन अधिकारी (नवि-२५), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१२. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, नागपूर.
१३. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी---------------------,
१४. मा. प्रधान सचिव (नवि-१) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. मा. प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. निवडनस्ती / नवि-२७.

*****